**भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील वरिष्ठ भूवैज्ञानिक (गट-अ) पदावरील अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आपना २०१४/प्र.क्र.८९/पापु-१५**
गो. ते. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१
तारीख: १६ एप्रिल, २०१५

वाचा :-

१) **शासन आदेश, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आपना २०१४ / प्र.क्र. ८९ / पापु-१५, दिनांक ३१.७.२०१४**

**शासन निर्णय:-**

श्री. आर. के. देशकर, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांची वरिष्ठ भूवैज्ञानिक कार्यालय, गडचिरोली येथून संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे येथे संदर्भाधिन आदेशान्वये बदली करण्यात आली आहे. त्यात या आदेशान्वये अंशत: बदल करण्यात येत असून श्री. आर. के. देशकर, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांची संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे येथे करण्यात आलेली बदली रद्द करुन त्यांची उपसंचालक कार्यालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर विभाग, नागपूर येथे रिक्त झालेल्या वरिष्ठ भूवैज्ञानिक या पदावर बदली करण्यात येत आहे. श्री. आर. के. देशकर, वरिष्ठ भूवैज्ञानिक यांची नागपूर येथे करण्यात येत असलेली बदली त्यांच्या विनंतीनुसार करण्यात येत असल्याने त्यांना कोणत्याही प्रकारचा प्रवासभत्ता व अनुषंगीक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

२. सदरहू आदेश महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम (४) (दोन) मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

अ) बदली झालेल्या अधिका-यास संबंधित कार्यालय प्रमुखांनी तात्काळ कार्यमुक्त करुन तसे संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांना कळवावे. तसेच, बदली झालेल्या अधिका-यांनी त्यांची पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे.

ब) बदली झालेल्या अधिका-यास बदलीच्या ठिकाणी संबंधित कार्यालयात आल्यानंतर विनाविलंब हजर करुन घ्यावे, अन्यथा संबंधित कार्यालयप्रमुखास जबाबदार धरण्यात येईल.

क) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिका-याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास संबंधित अधिकारी शिस्तभंगविषयक कार्यवाहीस पात्र ठरतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४१३१०३२०२५३२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kanade Pramod G

Digitally signed by Kanade Pramod G
DN: CN = Kanade Pramod G, C = IN, S = Maharashtra, O = Govt. of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2015.04.16 12:51:03 +05'30'

**( प्रमोद गि. कानडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.

२. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर

३. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

४. संबंधित अधिकारी (संचालकांमार्फत)

५. निवडनस्ती.(पापु-१५)